**सचिव, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, पुणे यांना "विभाग प्रमुख" घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सनिप्रा-२०१५/प्र.क्र. २४/१३-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
तारीख: ०३ मार्च, २०१५.

वाचा :

१) **शासन अधिसूचना, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : सीएसएल-२०१३/प्र.क्र. १२४/१५-स, दिनांक ३० मार्च, २०१३.**
२) **शासन निर्णय क्रमांकः सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : सवि-३११३/प्र.क्र. ७२/आस्था-१, दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१३.**

प्रस्तावना :

केंद्र शासनाच्या ९७ व्या घटना दुरुस्तीमधील कलम २४३ झेडके (२) नुसार राज्यातील सर्व सहकारी संस्थांच्या निवडणूका घेण्यासाठी व त्यावर देखरेख / नियंत्रण ठेवण्यासाठी स्वतंत्र निवडणुक प्राधिकरण निर्माण करण्याची तरतूद करण्यात आली. त्यानुसार महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील कलम ७३ कब अन्वये राज्य निवडणुक आयोगाच्या धर्तीवर दिनांक ३०/०३/२०१३ च्या अधिसूचनेद्वारे राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण गठीत करण्यात आले आहे. प्राधिकरणाच्या कामकाजाचे सुसूत्रीकरण व नियंत्रण ठेवण्यासाठी सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण यांना "विभाग प्रमुख" म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील कलम ७३ कब मधील तरतुदीनुसार राज्यातील सर्व सहकारी संस्थांच्या निवडणुका घेण्यासाठी व त्यावर देखरेख / नियंत्रण ठेवण्यासाठी राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण गठीत करण्यात आले आहे.

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या कलम ७३ कब (३) नुसार नियुक्त केलेले सचिव, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण हे प्रशासकीय व वित्तीय बाबींसदर्भात महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील ९ (२२) आणि वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग - पहिला, उप विभाग - एक, नियम क्र. २ मधील शर्तीची व अटींची पूर्तता करीत असल्यामुळे सदर नियमांच्या अधीन राहून सचिव, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "विभाग प्रमुख" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ.संदर्भ क्र. ६५/१५/विनियम, दिनांक ०६/०२/२०१५ अन्वये देण्यात आलेल्या अभिप्रायांच्या अनुषंगाने तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग - पहिला, उप विभाग - एक, नियम क्र. २ नुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०४११३८२३९१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Santosh Arun Patil
Date: 2015.03.04 11:47:11 +05'30'

**संतोष पाटील**
विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७. प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. सर्व सह / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती.